**शासकीय इमारती भाडेतत्वावर घेण्यासंबंधीचे धोरण ठरविण्यासाठी समिती गठित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१६/प्र.क्र.२/का.१४६१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
तारीख: १८ मे, २०१७

**प्रस्तावना :-**

शासकीय इमारतींच्या बांधकामासाठी शासनाचा बराचसा निधी गुंतून राहतो. तसेच शासकीय इमारतींच्या देखभाल व दुरुस्तीसाठी शासनाचा निधी व मनुष्यबळ खर्ची पडते. त्यामुळे यापुढे शासकीय प्रयोजनासाठीच्या इमारती २५ वर्षाच्या कालावधीसाठी भाडेतत्वावर वापरावयास घेण्यासंबंधीचे धोरण ठरविणे आवश्यक आहे. यामुळे शासनाचा निधी अधिक महत्वाच्या लोकोपयोगी विकासाच्या कामांसाठी वापरणे शक्य होईल.

सन २०१७-१८ च्या अर्थसंकल्पिय भाषणामध्ये मा.मंत्री (वित्त) यांनी केलेल्या घोषणेनुसार शासकीय प्रयोजनासाठी इमारती भाडेतत्वावर घेण्यासंबंधीचे धोरण ठरविण्याकरिता उच्चस्तरीय समितीचे गठण करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय**:-

शासकीय वापरासाठी आवश्यक असलेल्या इमारतींचे बांधकाम करण्याऐवजी त्या भाडेतत्वावर घेण्यासंबंधी धोरण ठरविण्यासाठी खालीलप्रमाणे समिती स्थापन करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग | : | अध्यक्ष |
| २) प्रधान सचिव/ सचिव , वित्त विभाग | : | सदस्य |
| ३) प्रधान सचिव / सचिव , सार्वजनिक बांधकाम विभाग | : | सदस्य |
| ४) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव , सार्वजनिक आरोग्य विभाग | : | सदस्य |
| ५) प्रधान सचिव / सचिव, आदिवासी विकास विभाग | : | सदस्य |
| ६) प्रधान सचिव / सचिव , महिला व बाल विकास विभाग | : | सदस्य |
| ७) प्रधान सचिव / सचिव , सामाजिक न्याय विभाग | : | सदस्य |

समितीच्या बैठकांमध्ये चर्चिल्या जाणाऱ्या विषयांच्या अनुषंगाने आवश्यकतेप्रमाणे इतर अधिकाऱ्यांना निमंत्रित करण्यात येईल.

सहसचिव / उपसचिव , नियोजन विभाग हे या समितीचे सदस्य सचिव असतील.

२. **समितीची कार्यकक्षा :-**

शासकीय प्रयोजनासाठीच्या इमारती ( प्रशासकीय, निवासी इ. ) २५ वर्षाच्या दिर्घ कालावधीसाठी भाडेतत्वावर वापरावयास घेण्यासंबंधीचे धोरण ठरविणे.

समितीने याबाबत सर्वकष अहवाल दिनांक ३१.७.२०१७ पर्यत सादर करावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५१८१४१३४२०६१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Charushila Chandrakant Tambekar

Digitally signed by Charushila Chandrakant Tambekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=332dfd6e6db0a06570cca25f9c39add2bebc7d207b3405d11e474330d0a9e014, cn=Charushila Chandrakant Tambekar
Date: 2017.05.29 15:21:06 +05'30'

**( चारुशीला तांबेकर )**
सह सचिव, नियोजन विभाग

**प्रत,**

१) मा. राज्यपाल , महाराष्ट्र राज्य यांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
३) मा. मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव
४) मा.राज्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव
५) मुख्य सचिव, यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
६) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग
७) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग
८) अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग
९) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग
१०) प्रधान सचिव / सचिव, आदिवासी विकास विभाग
११) प्रधान सचिव, सामाजिक न्याय विभाग
१२) सचिव, महिला व बाल विकास विभाग
१३) निवडनस्ती / कार्यासन १४६१ कार्यासन.